“गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगाव क्षेत्रात मुलभूत सुविधा निर्माण करणे” व “वंदनीय राष्ट्रसंत तुकडोजी महाराज मोझरी, जिल्हा अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करणे” या २ तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांचे संनियंत्रण व अंमलबजावणीसाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या कार्यालयात निर्माण करण्यात आलेली अस्थायी पदे पुढे चालु ठेवण्यास मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०१३/प्र.क्र.५८/का.१४४४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १७ मार्च, २०२०.

वाचा :-

१) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः इपीडी-१०१०/प्र.क्र.३१२/का.१४२१ दि. १४ .१२.२०१०
२) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०११/प्र.क्र.९७/का.१४४४ दि. ०४.०१.२०१२
३) नियोजन विभाग शासन आदेश क्रमांकः तिक्षेवि-२०१३/प्र.क्र.५८/का.१४४४ दि. ०१.१०.२०१९.

**शासन निर्णय :-**

“गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगाव क्षेत्रात मुलभूत सुविधा निर्माण करणे” व “वंदनीय राष्ट्रसंत तुकडोजी महाराज मोझरी, जिल्हा अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करणे” या २ तीर्थक्षेत्र विकास आराखड्यातील कामांचे संनियंत्रण व अंमलबजावणीसाठी अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या आस्थापनेवर विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या कार्यालयासाठी निर्माण करण्यात आलेल्या खालील ६ पदांना संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. १ ऑक्टोबर, २०१९ च्या शासन निर्णयान्वये दि. २९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आली आहे. सदरहू ६ अस्थायी पदांना दि. १ मार्च, २०२० ते दि. ३१ ऑगस्ट, २०२० या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

| योजनेचे नाव | कार्यालयाचे नाव | पदनाम व जुनी/नविन वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| श्रीगजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सव शेगाव विकास आराखडा आणि राष्ट्रसंत तुकडोजी महाराज श्रीक्षेत्र मोझरी, जिल्हा अमरावती, विकास आराखडा | विभागीय आयुक्त, अमरावती | विशेष कार्य अधिकारी<br>रु.१५६००-३९१००+ग्रेड पे रु.५४००<br>S-२०, ५६१००-१७७५०० | २ |
| | | संशोधन सहायक<br>रु.९३००-३४८००+ग्रेड पे रु.४३००<br>S-१४, ३८६००-१२२८०० | २ |
| | | लिपिक-टंकलेखक<br>रु. ५२००-२०२००+ग्रेड पे रु.१९००<br>S-६, १९९००-६३२०० | २ |
| | | **एकूण पदे** | **६** |

"गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगाव क्षेत्रात मुलभूत सुविधा निर्माण करणे" व "वंदनीय राष्ट्रसंत तुकडोजी महाराज मोझरी, जिल्हा अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करणे" या २ तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांचे संनियंत्रण व अंमलबजावणीसाठी करण्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या उपरोक्त ६ अस्थायी पदांच्या वेतनावर व भत्यांवर होणारा खर्च "मागणी क्र. ओ-८, ३४५२, पर्यटन, ०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१, पर्यटन केंद्रे," या लेखाशिर्षाखालील संबंधित उपशिर्षांतर्गत खर्ची टाकून, सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात, "(०१) वेतन", या उद्दीष्ठाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक १२ फेब्रुवारी, २०२० व प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१७१३२६५४०७१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a94ef1b631f4673b829ac9adbeb5b0ddabd086a7544e3fdf47cd7a011ff7ea40, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2020.03.17 13:29:12 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग अमरावती
४) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
५) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रशासकीय इमारत,वांद्रे (पूर्व ),मुंबई-५१
६) वित्त विभाग (व्यय-८)/वित्तीय सुधारणा/आ.पु.क, मंत्रालय,मुंबई
७) नियोजन विभाग-का-१४२४/का-१४२१/का-१४२६/का-१४२७ मंत्रालय,मुंबई
८) निवड नस्ती का. १४४४, नियोजन विभाग.